**डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवर नवीन ४ पदे निर्माण करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : विप्रप्र-२०१०/१५२/प्र.क्र.१०७/१०/१२-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ४ मे, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टीआरएन-१०९६/प्र.क्र.३३/९६/१२-अ, दि.७.१२.१९९६.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टीआरएन-१०९७/प्र.क्र.८०/९७/१२-अ, दि.९.९.१९९७.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टीआरएन-१०९६/प्र.क्र.३५/९७/१२-अ, दि.२०.३.१९९८.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-विप्रप्र-२००३/४६४/प्र.क्र.१३३/०३/१२-अ, दि.३१.७.२००४ व दि.२५.८.२००४
५) वित्त विभागाचे क्र.पदनि-२०११/प्र.क्र.६५/११/वित्तीय सुधारणा-१, दि.३१.३.२०११

**प्रस्तावना :-**

विदर्भातील वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी व कर्मचारी यांना यशदा प्रमाणे प्रशिक्षण देण्यासाठी विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेची स्थापना वरील संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली. संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सदर संस्थेचे डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती असे नामकरण करण्यात आले. संस्थेसाठी संदर्भ क्र.१ व ३ अन्वये अनुक्रमे ५ व ४ अशी एकूण ९ पदे निर्माण करण्यात आली. वाहनचालकाची नेमणूक कंत्राटी पध्दतीवर करण्याचे आदेश देण्यात आले. अशाप्रकारे सदर संस्थेसाठी एकूण १० पदे निर्माण करण्यात आली होती. परंतु सहयोगी प्राध्यापकाचे पद बराच काळ भरले न गेल्यामुळे संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये पदांच्या सुधारित आकृतिबंधामध्ये सदर संस्थेसाठी एकूण ९ पदे मंजूर करण्यात आली.

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेमध्ये सध्या अमरावती व नागपूर या दोन विभागातील जिल्हा परिषद, महसूल, पाटबंधारे, बांधकाम, पोलीस, आदिवासी विकास विभाग, वन विभाग, लेखा व कोषागारे इत्यादी विभागाचे वर्ग-२ व वर्ग-३ चे अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यात येते. सदर प्रशिक्षण हे तासिका निहाय बाहेरील प्रशिक्षकांकडून दिले जाते. तसेच इतर विभागांकडूनही पायाभूत प्रशिक्षण व निरंतर प्रशिक्षण देण्याबाबत मागणी होत आहे. तसेच वर्ग-४ चे कर्मचारी यांनाही मोठया प्रमाणात प्रशिक्षणाची आवश्यकता असल्याने प्रशिक्षण सत्रात वाढ करण्याची आवश्यकता आहे. त्यादृष्टीने कायमस्वरुपी अधिकारी /कर्मचारी वर्ग प्रबोधिनीत असल्यास प्रशिक्षणाच्या गुणवत्तेत भर पडेल व जास्तीत जास्त प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देता येईल. त्याअनुषंगाने सदर संस्थेच्या आस्थापनेवर अतिरिक्त नवीन पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवर खाली नमूद केलेली ४ नवीन पदे निर्माण करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदसंख्या | वेतनश्रेणी | ग्रेड वेतन |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक प्राध्यापक | २ | १५६००-३९१०० | ५,००० |
| २ | लेखाधिकारी | १ | ९३००-३४८०० | ४,४०० |
| ३ | सत्र समन्वयक | १ | ९३००-३४८०० | ४,३०० |

२. वरील ४ हंगामी पदे शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येतील व त्याची मुदत दि.२९ फेब्रुवारी, २०१२ पर्यंत राहील.

३. यावर होणारा खर्च **मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० -इतर प्रशासनिक सेवा ००३ प्रशिक्षण - राज्य योजनांतर्गत योजना (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान (२०७० ०७५५)-३६ वेतन"** याखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. वरील पद निर्मितीस वित्त विभागाच्या उच्च स्तरीय सचिव समितीने त्यांच्या दि.२९ मार्च, २०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मंजूरी दिली आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०५०५११०६२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(मा.प्र.कुलकर्णी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
विभागीय आयुक्त, अमरावती,
विशेष कार्यकारी अधिकारी तथा अपर जिल्हाधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती,
उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती,
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
उप कोषागार कार्यालय, अमरावती,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
अवर सचिव, साप्रवि/२५,
निवड नस्ती (साप्रवि/१२-अ)

E:\olddata\c\Amruta\Post Creation.VPP/ G.R.-Post Creation- VPP